**पोलीस दलातील अनुकंपा तत्त्वावरील पोलीस शिपाई व वर्ग "ड" पदावर नियुक्ती देण्याचे अधिकार संबंधित पोलीस घटक प्रमुखांना प्रदान करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्रमांक-आरसीटी-०१००३/प्र.क्र.६७७/पोल-५(ब),
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:- २३ फेब्रुवारी, २००४.

वाचा :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/६/अनुकंपा/ठाणे/मार्गदर्शन/२०००, दिनांक १८.१२.२००२.

प्रस्तावना:- अनुकंपा तत्त्वावर शासकीय सेवेत नियुक्ती देण्याबाबतची योजना १९७६ पासून शासनाने अंमलात आणली आहे. सध्या सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय, दिनांक २६.१०.१९९४ अनुसार अनुकंपा तत्त्वावर शासकीय सेवेत नियुक्ती देण्यात येते अनुकंपा तत्त्वावर नियुक्त्या करण्याचे अधिकार जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी व बृहन्मुंबई मध्ये सामान्य प्रशासन विभाग यांना देण्यात आलेले आहेत.

मुंबईतील सर्व विभाग/कार्यालयांची अनुकंपा तत्त्वावरील लिपिक-टंकलेखक पदासाठी उमेदवारांची प्रतिक्षायादी सामान्य प्रशासन विभागाकडे संकलित करण्यात येते, फक्त पोलीस शिपाई पदांची प्रतिक्षा यादी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई या कार्यालयाकडे ठेवण्यात येते.

जिल्हास्तरावर, शासन निर्णय,दिनांक २६.१०.१९९४ अनुसार पात्रता तपासून पात्र उमेदवारांची शिफारस जिल्ह्यातील पोलीस घटक कार्यालये संबंधित जिल्हाधिकारी यांच्याकडे सादर करतात व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक १२ मार्च, १९९७ अन्वये जिल्हाधिकारी सर्व विभागांची एकत्रित प्रतिक्षायादी तयार करतात. ज्येष्ठताक्रमानुसार अनुकंपा तत्त्वावर पदांच्या उपलब्धतेनुसार शासकीय सेवेत नियुक्त्या देण्यात येतात.

पोलीस दलातील दिवंगत पोलीस कर्मचा-यांच्या वारसाची अनुकंपा तत्त्वावरील सर्व विभागांची मिळून एकत्रित प्रतिक्षा यादी जिल्हाधिका-यांकडे असल्याने पोलीस दलातील दिवंगत कर्मचा-यांच्या वारसास अनुकंपा तत्त्वावर नोकरी मिळण्यास विलंब होत होता. पोलीसांच्या वारसांची अनुकंपा तत्त्वावरील प्रतिक्षा यादी जिल्हाधिकारी यांचेकडे न ठेवता ती पोलीस आयुक्त व जिल्हा पोलीस अधीक्षक यांचेकडे ठेवण्यात येऊन त्यांना भरतीचे अधिकार देण्यात यावेत असा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय :-

१) पोलीस दलातील अनुकंपा तत्त्वावरील पोलीस शिपाई व वर्ग-ड उमेदवारांची प्रतिक्षा यादी जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांचेकडे न ठेवता संबंधित पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधीक्षक या कार्यालयाकडे एकत्रित ठेवण्यात येईल.

२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना अनुकंपा तत्त्वावर पोलीस शिपाई व गट "ड" पदावर नियुक्ती करण्याचे अधिकार आहेत. हेच अधिकार संबंधित पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधीक्षक यांचेकडे देण्यात येत आहेत.

३) पोलीसांच्या वारसांना पोलीस शिपाई पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देताना संबंधित उमेदवारांच्या मैदानी, लेखी व मुलाखती या चाचण्या घेण्यात येऊ नयेत.

४) पोलीस दलातील अनुकंपा तत्त्वावर लिपिक-टंकलेखक या पदावरील उमेदवारांची यादी सध्या असलेल्या प्रचलित पध्दतीप्रमाणे जिल्हाधिकारी कार्यालयाकडे ठेवण्यात येईल.

अनुकंपा तत्त्वावर पोलीस शिपाई व गट "ड" च्या पदावरील नियुक्तीसाठीचे प्रस्ताव पोलीस कार्यालयांकडून जिल्हाधिकारी कार्यालयाकडे पाठविण्याची आवश्यकता राहणार नाही. तसेच यापूर्वी पाठविण्यात आलेले व प्रलंबित असलेले प्रस्ताव जिल्हाधिकारी यांनी संबंधित पोलीस कार्यालयाकडे तात्काळ परत करावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार,

( मा. रा. शेरे )

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रत,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,

सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक

सर्व पोलीस आयुक्त,

सर्व जिल्हाधिकारी,

सर्व पोलीस अधीक्षक,

सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.